C-DAC मार्फ़त Push व Pull SMS सेवा घेण्यासाठी येणा-या रु.९.६६ लक्ष इतक्या खर्चास प्रशासकीय मंजुरी देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: ईप्रशा २०२२/(३१/२०२२)/लपा**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०४/०२/२०२२

**विषय :-** C-DAC मार्फ़त Push व Pull SMS सेवा घेण्यासाठी येणा-या रु.९.६६ लक्ष इतक्या खर्चास प्रशासकीय मंजुरी देणेबाबत.

**संदर्भ** :- १) शासन निर्णय - क्र. ई-प्रशासन २०१३/(२७/१३)/लपा-१, दि.१२/०३/२०१३.
२) शासनाने पत्र क्र. संकीर्ण २०१५/(२३१/१५)/लपा-१, दि.१२/१०/२०१५.
३) शासन निर्णय क्र. ई-प्रशासन २०१७/२६१/प्र.क्र.९०/निवसं-३, दि.०८/१२/२०१७.
४) अधीक्षक अभियंता, ई-प्रशासन मंडळ, पुणे, यांचे पत्र क्र. ईप्रमं./C-DAC sms service/१०६२ /सन-२०२१, दि.२५/०८/२०२१

**प्रस्तावना :-**

C-DAC या केंद्र शासनाच्या अंगीकृत संस्थेमार्फ़त जलसंपदा विभागासाठी Push व Pull SMS सेवा घेण्यात आली आहे. क्षेत्रीय कार्यालयांकडुन प्रवाह प्रणालीतील पाणीसाठा (storage) दररोज C-DAC Gateway द्वारे अद्यावत केला जातो. तसेच E-Times (WALMI+META+RTC), NI- Billing, E-Service book, E-bill, QC & MT, MDM अंतर्गत चालणा-या कामकाजाकरीता C-DAC Gateway चे Push SMS सेवेचा वापर करण्यात येतो. तसेच META नाशिक कार्यालयामार्फ़त विविध प्रशिक्षणार्थींना SMS पाठविण्यासाठी या Gateway चा उपयोग करण्यात येतो.

संदर्भिय शासन निर्णय क्र.-३ अन्वये सन २०१८-१९, २०१९-२० व २०२०-२१ या तीन वर्षांकरीता C-DAC Push व Pull SMS सेवा घेण्यासाठी रु.३,५३,६९४/- रक्कम लेखाशिर्ष ३४५१-२७१९ अंतर्गत ०१७ (संगणक खर्च) या शिर्षाखाली खर्च करण्यास प्रशासकीय मंजुरी देण्यात आली होती. सदर मान्यता ही प्रत्येक वर्षासाठी स्वतंत्रपणे देण्यात आली असल्याने C-DAC SMS सेवा पुढे अखंडित ठेवण्याच्या दृष्टीने त्यासाठी पुढील ५ वर्षांकरीता खर्च रु.९.६६ लक्ष किंमतीच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार प्रशासकीय मान्यता देण्याचा निर्णय खालीलप्रमाणे घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

C-DAC या केंद्र शासनाच्या अंगीकृत संस्थेमार्फ़त जलसंपदा विभागासाठी Push व Pull SMS सेवा घेण्यात आली आहे. यासाठी प्रति SMS रु.०.०२३१/sms इतका खर्च येणार असुन वार्षिक कमाल वापर क्षमतेवर आधारित पुढील पाच वर्षांसाठी येणारा खर्च रु.९.६६ लक्ष इतका आहे.

संदर्भ क्र.-१ व २ नुसार रु.१० लक्ष पर्यंतच्या ई-प्रशासन प्रकल्पांना प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार जलसंपदा विभागास आहेत. त्या अनुषंगाने C-DAC कडून SMS सेवा घेण्यासाठी रु.९.६६ लक्ष किंमतीस प्रशासकीय मंजुरी देण्यात येत आहे.

या प्रित्यर्थ होणारा खर्च ३४५१ - सचिवालयीन आर्थिक सेवा ०९०-सचिवालय (०१) जलसंपदा विभाग आस्थापना (०१) (०३) ई-गर्व्हनन्स प्रकल्प-१७ संगणक खर्च योजनांतर्गत (३४५१-२७१९) या शिर्षांतर्गत करण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संकेतांक २०२२०२०४१७१३२५११२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Rekha Ajit Bhawar
Date: 2022.02.04 17:17:08 +05'30'

**( रेखा भवार )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत:**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. सर्व मा. मंत्री/मा. राज्य मंत्री, महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. विरोधी पक्ष नेते विधान परिषद/विधान सभा.
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव (ले व को) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९. अपर मुख्य सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
११. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास मंहामंडळ
१३. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपुर.
१४. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परीक्षा), मुंबई/नागपुर.
१५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१६. कोषागार अधिकारी, पुणे/नागपुर/औरंगाबाद/ठाणे/जळगाव.
१७. मुख्य अभियंता, (वि.प्र.) , जलसंपदा विभाग, पुणे.
१८. आंतर वित्त सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. अधीक्षक अभियंता, जलसंपदा, ई-प्रशासन मंडळ, पुणे.
२०. कार्यासने अर्थ-१/२/ लेखा/ निवसं, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१. लपा कार्यासन संग्रहार्थ.